"राष्ट्रीय कर्करोग,मधुमेह, ह्दयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम" केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर ॲण्ड रिसर्च सेंटर, नागपूर व विवेकानंद मेडीकल फाउंडेशन ॲन्ड रिसर्च सेंटर, लातूर येथील टर्शरी केअर कॅन्सर सेंटरसाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (TCS) राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिसीसी-२०२३/प्र.क्र.२६/आरोग्य-३अ**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २८ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) संचालक,आरोग्य सेवा,मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/अंनिका/कक्ष-८अ/टीएसपी/पुरवणी मागणी /४९७-५००/२३, दिनांक १० मार्च, २०२३
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक बीयुडी-२०२२/प्र.क्र.०५/कार्यासन ६, दिनांक २४ मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत " राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंञण कार्यक्रम" मध्ये टर्शरी कॅन्सर सेंटर (TCCC) स्थापन करण्याकरिता राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर हॉस्पिटल ॲन्ड रिसर्च सेंटर,नागपूर व विवेकानंद मेडीकल फाऊंडेशन ॲड रिसर्च सेंटर,लातूर या संस्थेस आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (TCS) २२१० एफ ८५४ या लेखाशिर्षा अंतर्गत केंद्र शासनाने वितरीत केलेल्या केंद्र हिस्सा ६० टक्के अनुक्रमे रु.४५.४० लक्ष व रु.१८९.३४ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्यात आले असून व त्यास समरुप राज्य हिस्सा २२१०एफ ९७२ या लेखाशिर्षा अंतर्गत ४० टक्के प्रमाणे अनुक्रमे रु. ३०.२६ लक्ष व रु.१२६.२३ लक्ष असे एकूण रु.१५६.४९ लक्ष इतका निधी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतुन संस्थेस टर्शरी कॅन्सर सेंटर (TCCC) स्थापन करण्याकरिता उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्ण घेण्यात आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत " राष्ट्रीय कर्करोग,मधुमेह,हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम" मध्ये टर्शरी कॅन्सर सेंटर (TCCC) स्थापन करण्याकरिता राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर हॉस्पिटल ॲन्ड रिसर्च सेंटर,नागपूर व विवेकानंद मेडीकल फाऊंडेशन ॲड रिसर्च सेंटर,लातूर या संस्थेस आदिवासी विकास विभाग TSP राज्य हिस्सा २२१०एफ ९७२ या लेखाशिर्षा अंतर्गत ४० टक्के प्रमाणे अनुक्रमे रु.३०.२६ लक्ष व रु. १२६.२३ लक्ष असे एकूण रु. १५६.४९ लक्ष इतका निधी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतुन संस्थेस टर्शरी कॅन्सर सेंटर (TCCC) स्थापन करण्याकरिता वितरीत करण्यास शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकिय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी त्याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी महाराष्ट्र (TCP) यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र. ), आरोग्य सेवा मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे .

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ साठी मंजूर करण्यात अलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

( रुपये लाखात )

| अ.क्र. | तपशिल | लेखाशिर्ष | सन २०२२-२०२३ साठी सुधारीत अंदाज | वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २२१० वैदयकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(४०) राष्ट्रीय कर्करोग,मधुमेह, हृदयरोग व पक्षाघात प्रतिबंधक नियंत्रण कार्यक्रम (एनपीसीडीसीएस) | लेखाशिर्ष २२१०एफ ९७२ | रु. १५६.४९ | रु.१५६.४९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | ३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>लेखाशिर्ष २२१० एफ ९७२ ( राज्य हिस्सा ४० टक्के) | | | |

४. वित्त विभागाच्या दि. ०४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्या क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख /संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दि. ०४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्या क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात आले आहे.

यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने महालेखापरिक्षकांच्या लेखापरीक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी सदर संस्थेच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे सदर संस्थेच्या अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदरील अनुदान सशर्त असून वित्त विभागाने शासन परिपत्रक, क्र.मुंविनि २०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२ जानेवारी, २०२३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकिय मान्यता घेण्यात यावी. तसेच केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्रमांक F.No.T-

२००१५/०९/२०१६ - CR Date १६ जून, २०१७ व F.No.T-२००१५/२/२०१४ - CR Date ३१ ऑक्टोबर, २०१७ मधील परिच्छेद क्रमांक -२ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र. २ येथील दिनांक २४ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सर्व अटींचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या दिनांक २४ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१२२१५७१६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.03.28 16:49:20 +05'30'

( अ. मा. आत्राम )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबइ.
११. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२. निवडनस्ती ( आरोग्य -३अ) .